**जागतिक बँक सहाय्यीत महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि-विकास प्रकल्पास (Maharashtra Agricultural Competitiveness Project - MACP) मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. बासप्र - २००८ / प्र. क्र. ४५ /२१-स**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०००३२.**
**दिनांक - ०९/०५/२०११.**

**वाचा -** (१) शासन निर्णय क्र. कृबास-२००७ / प्र.क्र. ४०/ ११-स, दि. ३१-१२-२००७.

**प्रास्ताविकः**

शेतकऱ्यांच्या शेतमालास योग्य भाव मिळावा आणि त्यांच्या उत्पन्नात वृद्धी व्हावी याकरीता कृषि पणन व्यवस्थेमधील त्रुटी दूर करुन पणनविषयक पायाभूत सुविधांचे बळकटीकरण व आधुनिकीकरण करण्याबरोबरच; सध्याच्या पणन व्यवस्थेस पर्यायी व कार्यक्षम बाजार प्रणाली निर्माण करण्याकरिता, राज्य शासन जागतिक बँकेच्या अर्थसहाय्याने "महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि-विकास प्रकल्प (Maharashtra Agriculture Competitiveness Project)" राबविणार आहे. या प्रकल्पांतर्गत प्रामुख्याने ग्राम-पातळीपासून राज्यातील प्रमुख बाजार समित्यांमध्ये पणन विषयक पायाभूत सुविधांचे बळकटीकरण व आधुनिकीकरण करण्याबरोबरच, शेतक-यांचे गट स्थापन करुन 'स्वतःचा कृषिमाल स्वतः विक्री करण्याकरिता' शेतक-यांचे संघटन व सक्षमीकरण करण्यात येणार आहे.

जागतिक बँक सहाय्यीत "महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि-विकास प्रकल्पास (MACP)" राज्य शासनाने दिनांक ०७.०५.२००९ रोजी मान्यता दिली असून जागतिक बँकेने सदर प्रकल्पास दि. २८.०९.२०१० रोजी मंजूरी प्रदान केली आहे, तसेच दि. २०.१२.२०१० पासून प्रकल्पाकरिता कर्ज उपलब्ध (Loan Effectiveness) करुन दिले आहे. कृषि पणन क्षेत्रातील या महत्वकांक्षी प्रकल्पाच्या अंमलबजावणीबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

**१.** जागतिक बँक सहाय्यीत "महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि-विकास प्रकल्पाच्या (MACP)" अंमलबजावणीकरिता पणन विभागाची 'नोडल विभाग' म्हणून नेमणूक करण्यात येत असून या प्रकल्पामध्ये पणन विभागाबरोबरच कृषि आणि पशुसंवर्धन या विभागांचा सहभाग राहील (Line Departments).

**२.** आगामी ६ वर्षांमध्ये दि. ३१.१२.२०१६ पर्यंत राज्यातील ३३ जिल्हयांमध्ये या प्रकल्पाची ३ टप्प्यांमध्ये अंमलबजावणी करण्यात येणार आहे

पहिला टप्पा: १० जिल्हे: अमरावती, अकोला, वाशीम, यवतमाळ, बुलढाणा, जालना, औरंगाबाद, परभणी, हिंगोली, अहमदनगर

दुसरा टप्पा: ११ जिल्हे: नागपूर, वर्धा, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर, गडचिरोली, लातूर, बीड, उस्मानाबाद, नांदेड, सोलापूर

तिसरा टप्पा: १२ जिल्हे: सिंधुदुर्ग, रत्नागिरी, रायगड, ठाणे, नाशिक, धुळे, जळगांव, नंदुरबार, पुणे, सातारा, सांगली, कोल्हापूर

**३.** या प्रकल्पाची अंमलबजावणी जागतिक बँक व केंद्र शासनामध्ये झालेल्या 'प्रकल्प वित्त-पुरवठा करार (Project Financing Agreement)' आणि राज्य शासन व जागतिक बँकेमध्ये झालेल्या 'प्रकल्प करारातील (Project Agreement)' तरतूदींनुसार, तसेच प्रकल्पाच्या 'प्रकल्प अंमलबजावणी अहवालाप्रमाणे (Project

Implementation Plan)' करण्यात येणार आहे. त्याचप्रमाणे, प्रकल्पाकरिता तयार करण्यात आलेल्या 'वित्तीय व्यवस्थापन पुस्तिका (Financial Management Manual), प्रापण पुस्तिका (Procurement Manual), पर्यावरण व सामाजिक व्यवस्थापन योजना (Environment & Social Management Framework), समूह कृती पुस्तिका (Community Operations Manual)' सदर प्रकल्प अंमलबजावणीचे अविभाज्य भाग राहतील.

४. सदर प्रकल्पाचे प्रमुख घटक खालीलप्रमाणे आहेत.
- अ. बाजाराभिमुख सघन व वैविध्यपूर्ण कृषि-उत्पादन (Intensification and Diversification of Market led production)
- ब. बाजारपेठेतील शेतक-यांचा सहभाग अधिक सुलभ करणे (Improving Farmers Access to Market)
- क. प्रकल्पाचे व्यवस्थापन (Project Managment)

उपरोक्त घटक व त्याअंतर्गत उप-घटकांकरीता प्रकल्प अंमलबजावणी अहवालामध्ये निश्चित करण्यात आलेल्या वित्तीय निकषांप्रमाणे व मंजूर नियतव्ययाच्या मर्यादेत सदर प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यात यावी

५. ***प्रकल्पाची वित्तीय उभारणी :***

प्रकल्पाकरीता विविध स्त्रोतांमार्फत उभारण्यात येणारा निधी आणि त्यांचे एकुण प्रकल्प खर्चातील प्रमाण पुढीलप्रमाणे राहील.

| अ. क्र. | निधी स्त्रोत | प्रकल्प खर्चातील वाटा | | |
|---|---|---|---|---|
| | | दशलक्ष अमेरीकन डॉलर्स | सुमारे रुपये कोटीमध्ये | प्रमाण |
| १ | राज्य शासन | ११.२१ | ५२.०५ | ७.१९ % |
| २ | जागतिक बँकेचे कर्ज (International Development Authority) | १०० | ४६४.३० | ६५.३६% |
| ३ | लाभार्थी | ४१.३२ | १९१.८५ | २७.४५ % |
| **एकूण** | | **१५२.५३** | **७०८.२०** | **१०० %** |

**टिप:** प्रकल्पाच्या वित्तीय करारामध्ये प्रकल्पाकरिता ६५.९० दशलक्ष SDR मंजूर असून त्यानुषंगाने US $ व भारतीय रुपया या चलनामधील प्रकल्प किंमत दर्शविण्यात आल्या आहेत. रुपयातील रकमा १ US $=रु.४६.४३ विनिमय दराने तसेच अपूर्णांकातील अंक नजीकच्या दशांशस्थानापर्यंत पूर्णांकित करुन दर्शविले आहेत.

या प्रकल्पाची प्रकल्प किंमत सुमारे रु. ७०८.२० कोटी (१५२.५३ दशलक्ष अमेरीकन डॉलर) आहे. या प्रकल्पाकरिता जागतिक बँकेकडून सुमारे रु. ४६४.३० कोटी (१०० दशलक्ष अमेरीकन डॉलर) कर्जरुपाने ३५ वर्षांकरिता प्राप्त होणार असून त्याकरिता कोणतेही व्याज देय नाही, तथापि या रकमेवर प्रतिवर्ष ०.७५ % (१ % चा ३/४ भाग) दराने 'सेवा शुल्क' देय असणार आहे. त्याचप्रमाणे जागतिक बँकेकडून प्राप्त होणा-या कर्जापैकी अवितरीत कर्जावर (Unwithdrawn Financing Balance) प्रतिवर्ष ०.५० % (१ % चा १/२ भाग) या कमाल दराने 'बंध शुल्क (Commitment Charges)' अदा करावे लागणार आहे.

या प्रकल्पाकरिता जागतिक बँकेमार्फत प्राप्त होणा-या कर्जाकरिता सुरूवातीचे १० वर्ष 'ग्रेस पिरीएड' राहणार असून त्यादरम्यान कर्जाची परतफेड अपेक्षित नाही, तथापी सदर कर्जाच्या रकमेवर विहीत 'सेवा शुल्क आणि बंध शुल्क' देय राहील. जागतिक बँकेकडून प्राप्त होणा-या कर्जाची दि. १५ मार्च, २०२१ पासून दि. १५ सप्टेंबर, २०४५ पर्यंत प्रतीवर्ष माहे मार्च व स्पटेंबरच्या १५ तारखेपर्यंत २ हप्त्यांमध्ये परतफेड करावयाची आहे.

## ६. *प्रकल्प अंमलबजावणी:*

या प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरिता पुणे येथे 'प्रकल्प समन्वय यंत्रणा' उभारण्यात आली असून सदर यंत्रणेचे प्रमुख व प्रकल्प संचालक म्हणून भारतीय प्रशासकीय सेवेतील अधिका-यांची नियुक्ती करण्यात यावी. तसेच प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणेच्या अधिपत्याखाली प्रकल्पातील पणन, कृषि व पशुसंवर्धन विभागाच्या अखत्यारितील घटकांची अंमलबजावणी करण्याकरिता संबंधित विभागांनी स्वतंत्र 'प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणेची' प्रकल्पामध्ये नमूद मनुष्यबळाच्या आकृतीबंधासह स्थापना करावयाची आहे.

या प्रकल्पाच्या अंमलबजावणीचा वेळोवेळी आढावा घेण्याकरिता संदर्भांकित शासन निर्णयान्वये यापूर्वीच मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली सुकाणू समितीचे गठन करण्यात आले असून सदर समिती संपूर्ण प्रकल्प कालावधीमध्ये प्रकल्पाचे राज्यस्तरावरुन संनियंत्रण करेल.

## ७ *प्रकल्पाकरिता लेखाशिर्ष :*

महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पाकरिता अनुक्रमे राज्य शासनाचा व जागतिक बँकेतर्फे प्राप्त होणारा निधी उपलब्ध करुन देण्याकरिता पुढीलप्रमाणे लेखाशिर्ष उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

राज्य वाटाः

मागणी क्र. - व्ही-०२
मुख्यलेखाशिर्ष-२४३५-इतर कृषिविषयक कार्यक्रम,
(०१), पणन आणि गुण नियंत्रण,
(१९९), इतर अशासकीय संस्थांना अर्थसहाय्य,
(०१), बाहय सहाय्यीत प्रकल्प,
(०१), जागतिक बँक सहाय्यीत महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि-विकास प्रकल्प, (राज्य वाटा)
३२- अंशदान,
(२४३५-००१-७)

बाहय सहाय्याचा वाटाः

मागणी क्र. - व्ही-०२
मुख्यलेखाशिर्ष-२४३५-इतर कृषिविषयक कार्यक्रम,
(०१), पणन आणि गुण नियंत्रण,
(१९९), इतर अशासकीय संस्थांना अर्थसहाय्य,
(०१), बाहय सहाय्यीत प्रकल्प,
(०२), जागतिक बँक सहाय्यीत महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि-विकास प्रकल्प, (बाहय वाटा)
३२- अंशदान,
(२४३५-००२-६)

## ८ *प्रकल्पांतर्गत निधीवहन (Funds flow):*

जागतिक बँकेशी झालेल्या करारानुसार प्रकल्प निधी केंद्र शासनाच्या स्वतंत्र खात्यामध्ये जमा करण्यात येऊन तदनंतर तो राज्य शासनाच्या प्रकल्प खात्यावर केंद्र शासन व राज्य शासन यांच्यामधील कर्जाच्या अटी-शर्तीनुसार वर्ग करण्यात येईल. प्रकल्पांतर्गत प्रकल्प समन्वय यंत्रणा व सर्व प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणा यांच्यासह एकूण ८० हिशोब केंद्र (Accounting Centers) आहेत. दरवर्षी विहित वेळापत्रकाप्रमाणे प्रत्येक हिशोब केंद्र आपले वार्षिक अंदाजपत्रक तयार करून आपल्या संबंधित प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणेमार्फत प्रकल्प समन्वय यंत्रणेस सादर करेल. राज्यस्तरावर प्रकल्प समन्वय यंत्रणेने प्रकल्पाच्या अंदाजपत्रकाचे

संकलन करून एकत्रित अंदाजपत्रक पणन विभागास सादर करावे. सदर अंदाजपत्रकाआधारे पणन विभाग प्रकल्पाकरिता आवश्यक निधी अर्थसंकल्पीत करुन प्रकल्पामध्ये सहभागी असणा-या विभागांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे निधी उपलब्ध करुन देईल तसेच या विभागाच्या अधिनस्त असणा-या प्रकल्प व्यवस्थापन यंत्रणा, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळांतर्गत स्थापन करण्यात आलेल्या प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणा (पणन) आणि राज्य वखार महामंडळास निधी वितरणाचे आदेश निर्गमित करेल.

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या मान्यतेने तसेच वित्त विभागाच्या अनौ. सं. क्र. १७०/११/व्यय-२ व अनौ. सं. क्र. ७५/११/अर्थबळ, दि. ०७.०४.२०११ नुसार प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा क्रमांक २०११०५०९११५७५१००१ हा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही /-
(श्रीकांत चं. आंडगे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन,
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**प्रति:**

(१) महामहीम राज्यपाल यांचे सचिव.
(२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
(३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव.
(४) मा. मंत्री (कृषी व पणन / पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव. मंत्रालय, मुंबई.
(५) मा. राज्य मंत्री (कृषी / पणन / पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव. मंत्रालय, मुंबई.
(६) प्रधान सचिव (कृषी / पणन / पशुसंवर्धन/वित्त/नियोजन), मंत्रालय, मुंबई.
(७) आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य , पुणे.
(८) आयुक्त (पशुसंवर्धन), महाराष्ट्र राज्य, पुणे.
(९) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे.
(१०) प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प, पुणे.
(११) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व जिल्हे).
(१२) कृषि पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
(१३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे.
(१४) सर्व विभागीय कृषि सहसंचालक, महाराष्ट्र राज्य
(१५) सर्व विभागीय सह आयुक्त (पशुसंवर्धन), महाराष्ट्र राज्य
(१६) सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य
(१७) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी तथा सदस्य सचिव (ATMA), महाराष्ट्र राज्य
(१८) सर्व जिल्हा उप आयुक्त (पशुसंवर्धन), महाराष्ट्र राज्य
(१९) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था , महाराष्ट्र राज्य
(२०) महालेखापाल, महाराष्ट्र १, मुंबई (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता)
(२१) महालेखापाल, महाराष्ट्र २, नागपूर (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता)
(२२) कक्ष अधिकारी / अवर सचिव, (कार्यासन १७-स / २२-स), स.प. व व. विभाग, मंत्रालय, मुंबई
(२३) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प १३ / व्यय-२) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
(२४) निवड नस्ती.

***